वर्ष २०१० मधील
अतिउष्णतेमुळे संत्रा पिकांचे ५० % पेक्षा
जास्त झालेल्या नुकसानीसाठी मदत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०१० /प्र.क्र.४५१(५)/म-३,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ डिसेंबर,२०१०

प्रस्तावना :-

नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधीत झालेल्या शेतकऱ्यांना/व्यक्तींना केंद्र शासनाच्या CRF / NCCF च्या निकषाप्रमाणे, वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार व राज्य शासनाच्या १९८३ च्या शासन निर्णयाप्रमाणे मदत दिली जाते.

राज्यात सन २०१० मध्ये अतिउष्णतेमुळे ६७,१४५.२२ हेक्टर क्षेत्रावर संत्रा पिकाचे ५० टक्क्यापेक्षा जास्त नुकसान झालेल्या शेतकऱ्यांना शासनाने मदत दयावी, अशी कृषि विभागाने या विभागाला विनंती केली होती.

अति उष्णतेमुळे झालेले नुकसान हे नैसर्गिक आपत्तीत बसत नसले तरी शेतकऱ्यांना दिलासा देण्यासाठी एक विशेष बाब म्हणून मदत देण्याचा विचार शासनाच्या विचाराधीन होता. सर्व बाबींचा विचार करुन शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

शासन निर्णय :-

(१) राज्यामध्ये सन २०१० मध्ये झालेल्या अतिउष्णतेमुळे ५० टक्के पेक्षा जास्त नुकसान झालेल्या ६७,१४५.२२ हेक्टर क्षेत्रावर संत्रा पिकांना रु. १५,०००/- प्रमाणे एक विशेष बाब म्हणून मदत देण्यांत यावी.

(२) जिल्हानिहाय बाधित क्षेत्र सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे राहील. तसेच एकूण मदतीची कमाल मर्यादा रुपये १००.७२ कोटी राहील.

(३) उपरोक्त सर्व मदत एका शेतकऱ्याला प्रती २ हेक्टर मर्यादेपर्यंत अनुज्ञेय राहील.

(४) एका शेतकऱ्याला कमीत कमी मदत रु. ५००/- देण्यांत यावी.

(५) मदत वाटपाची सर्व कार्यवाही प्रचलित प्रध्दतीप्रमाणे कृषी विभागाने त्यांच्या क्षेत्रीय यंत्रणेमार्फत करावी. यासाठी कृषी विभागाने त्यांचे स्तरावर सविस्तर आदेश निर्गमित करावेत. हे करीत असतांना त्यांनी खालील बार्बीकडे विशेष लक्ष द्यावे :-

(i) ही मदत संबंधित खातेदाराच्या बँक बचत खात्यात थेट जमा करावी.

(ii) कोणत्याही खातेदाराला रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत देऊ नये.

(iii) मदत योग्य व्यक्तींना योग्य त्या प्रमाणात मिळेल, यांची दक्षता कृषी विभागाने घ्यावी. उदा. पात्र खातेदाराची यादी चावडी / ग्रामपंचायत / कृषी सहाय्यक यांच्या कार्यालयीन सूचना फलकावर ठळकपणे लावणे, अचानक पणे तपासणी करणे इत्यादी.

(६) मदतीची रक्कम खातेदाराच्या बँक खात्यावर थेट जमा करतांना मदतीच्या रक्कमेतून कोणत्याही बँकेने कसलीही वसूली करु नये, यासाठी सहकार विभागाने योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

(७) वित्त विभागाने आवश्यक असलेला निधी मदत व पुनर्वसन विभागाला उपलब्ध करुन दिल्यावर मदत व पुनर्वसन विभाग, तो निधी कृषी विभागाकडे हस्तांतरीत करेल.

(८) निधी मिळाल्यापासून कृषि विभागाने मदतीचे वाटप खास मोहिम आखून त्वरित पूर्ण करावे व वाटप व खर्चाचे समायोजन कोणत्याही परिस्थितीमध्ये मार्च, २०११ पूर्वी पूर्ण करावे.

(९) वरील मदत ही विशेष विशेष बाब असल्यामुळे, पूर्वोदाहरण म्हणून गणली जाणार नाही.

(१०) उक्त कार्यवाहीसाठी लागणा-या अतिरिक्त खर्चासाठी ( प्रवास, इंधन, कार्यालयीन खर्च इत्यादी ) वाटप केलेल्या रकमेच्या ०.४ टक्के एवढी रक्कम जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना व ०.१ टक्का एवढी रक्कम जिल्हाधिकारी यांना वितरीत करण्यात यावी.

(११) यावर होणारा खर्च, मागणी क्रमांक सी-६-२२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०२, पूर, चक्रीवादळे इत्याकदी १०१- सानुग्रह सहाय्य - १०१ (८) , इतर बाबी (२२४५ ०२४४) या मुख्य लेखाशिर्षातंर्गकत नोंदविण्यांत येऊन, तो त्याखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यांत यावा.

(१२) उपरोक्त खर्चास वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ४६८/१०/व्यय-९, दिनांक ३१.१२.२०१० अन्वये मान्यता प्राप्त आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

३१/१२/१०

**( ज.स.सहारिया )**
**प्रधान सचिव, मदत व पुनर्वसन**

प्रति,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषदा
आयुक्त,कृषी महाराष्ट्र राज्य,पुणे
विभागीय कृषी सहसंचालक,पुणे
महालेखापाल-१/२ (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती)
महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती)
संचालक,लेखा व कोषागारे, संगणक शाखा,मुंबई
महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई (२ प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
निवासी लेखा अधिकारी वांद्रे,मुंबई
ग्रंथपाल महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधान भवन,मुंबई (५ प्रती)
सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई ३२
सहकार व पणन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३,अर्थसंकल्प-६/अर्थोपाय कक्ष) मंत्रालय,मुंबई
म-३ कार्यासन (निवड नस्ती) महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई ३२
प्रत माहितीसाठी सादर :-
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिवांचे स्वीय सहाय्यक
मा. प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (कृषी) यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक

## परिशिष्ट

### सन २०१० मध्ये विदर्भातील संत्रा पिकांच्या आंबिया बहार व मृग बहाराअभावी झालेले नुकसान

| अ.क्र. | जिल्हा | आंबिया बहाराअभावी बाधित क्षेत्र | मृग बहाराअभावी बाधित क्षेत्र | एकूण बाधित क्षेत्र | रुपये १५,०००/- प्रमाणे द्यावयाची मदत (रु.कोटीत) |
|---|---|---|---|---|---|
| १ | नागपूर | १,५१०.८ | १२,९६७.३२ | १४,४७८.१२ | २१.७२ |
| २ | वर्धा | ० | ३,३७६.६४ | ३,३७६.६४ | ५.०६ |
| ३ | अमरावती | १४,२९०.४६ | ३५,००० | ४९,२९०.४६ | ७३.९४ |
|  | एकूण | १५,८०१.२६ | ५१,३४३.९६ | ६७,१४५.२२ | १००.७२ |